**उद्योग संचालनालयांतर्गत कार्यरत मैत्री कक्षाकरीता State Bank Of India या बँकेत खाते उघडण्यास तसेच SBIePay ही पेमेंट गेटवे सुविधा वापरण्यास परवानगी देण्याबाबत**

**महाराष्ट्र शासन**
**उद्योग, उर्जा, कामगार व खनिकर्म विभाग**
**शासन आदेश क्रमांकः संकीर्ण-२०२४/प्र.क्र.१०९/उद्योग-३**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
दिनांक: ०४ एप्रिल, २०२५

वाचा -

१. महाराष्ट्र कोषागार नियम, १९६८
२. मुंबई वित्तीय नियम १९५९
३. वित्त विभाग शासन निर्णय क्र. संकीर्ण २०२३/प्र.क्र.८८/२३/कोषा-प्रशा-५, दि.०३.१०.२०२३
४. वित्त विभाग शासन निर्णय क्र. संकीर्ण २०२४/प्र.क्र.५०/कोषा प्रशा-५, दि.२५.०६.२०२४
५. उद्योग संचालनालयाचे पत्र क्र उसं/मैत्री/Payment Gateways/२०२४, दि. निरंक

**प्रस्तावना**

उद्योग संचालनालयाच्या संदर्भ क्र. ५ येथील पत्रान्वये मैत्री पोर्टलद्वारे सेवा धारकांना सेवांचे शुल्क भरणा करण्याकरीता SBIePay ही पेमेंट गेटवे सुविधा घेण्यास मान्यता देण्याबाबत प्रस्तावित करण्यात आले आहे. महाराष्ट्र उद्योग, व्यापार व गुंतवणूक सुविधा अधिनियम (मैत्री), २०२३ दि.१४.०८.२०२३ रोजी अधिसूचित करण्यात आला आहे. सदर अधिनियमातील कलम १४ अन्वये या अधिनियमाच्या प्रयोजनार्थ महाराष्ट्रामध्ये एक खिडकी प्रणालीसाठी मैत्री कक्ष नोडल अभिकरण असेल. तसेच कलम १९ अन्वये नोडल अभिकरणास (मैत्री कक्ष) एक खिडकी प्रणालीमार्फत उपलब्ध करुन द्यावयाच्या सेवांसाठी विहित करण्यात येतील असे शुल्क आकारता येईल अशी तरतूद करण्यात आलेली आहे.

मैत्री कक्षाकडून ऑनलाईन प्रणालीद्वारे संपुर्ण राज्यातील औद्योगिक उपक्रमांना उपलब्ध करुन देण्यात येणाऱ्या परवानग्या/सेवा यांच्याकरीता आकारण्यात येणाऱ्या शुल्काकरीता SBIePay ही गेटवे सुविधा वापरण्यास तसेच त्याकरीता State Bank Of India या बँकेत खाते उघडण्यास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :**

महाराष्ट्र उद्योग, व्यापार व गुंतवणूक सुविधा अधिनियम (मैत्री), २०२३ च्या प्रयोजनार्थ मैत्री पोर्टल मार्फत राज्यातील औद्योगिक उपक्रमांना उपलब्ध करुन देण्यात येणाऱ्या परवानग्या/ सेवा यांच्याकरीता आकारण्यात येणाऱ्या शुल्काकरीता उद्योग संचालनालयांतर्गत कार्यरत मैत्री कक्षास State Bank Of India या बँकेमार्फत उपलब्ध करुन दिलेली SBIePay ही पेमेंट गेटवे सुविधा वापरण्यास तसेच त्याकरीता State Bank Of India या बँकेत खाते उघडण्यास खालील अटींच्या अधीन राहून मान्यता देण्यात येत आहे.

१. मैत्री कक्षाच्या Online पोर्टलवरील औद्योगिक उपक्रमांस उपलब्ध करुन देणाऱ्या परवानग्या/सेवा यांच्याकरीता आकारण्यात येणाऱ्या शुल्काकरीता पेमेंट गेटवे सुविधा वापरण्यास निधी खात्यात जमा करण्याकरीता करण्यात यावा.
२. अन्य प्रयोजनासाठी सदर खात्याच्या वापर करण्यात येऊ नये.
३. सदर खात्याच्या संदर्भात रोख वही (Cash Book) अद्यावत ठेवणे अनिवार्य राहील.
४. सदर बँक खात्यातील शिल्लक रकमा समुचित शासनखाती भरणा करणे आवश्यक असल्यास लागू असलेल्या नियम/विनियम यानुसार त्याप्रमाणे कार्यवाही करणे अनिवार्य राहील.
५. सदर बँक खात्यातील व्यवहाराचे मासिक ताळमेळ करणे तसेच लेखा परिक्षण अनिवार्य आहे.
६. सदर बँक खात्यात दिर्घकाळ निधी विनावापर पडून राहणार नाही या दृष्टीने दक्षता घेण्यात यावी.
७. विवक्षित प्रयोजन संपुष्टात आल्यानंतर सदर बँक खाते तात्काळ बंद करणे आवश्यक आहे.
८. सदर बँक खात्याच्या संदर्भात महाराष्ट्र कोषागार नियम, १९६८ मधील नियम क्र. (३), (८), (१३) व (१५) तसेच मुंबई वित्तीय नियम, १९५९ मधील नियम (७) अन्वये विहित करण्यात आलेल्या तरतूदींचे काटेकोर अनुपालन करणे आवश्यक आहे.
९. वित्त विभाग शासन निर्णय दि.०३.१०.२०२३ आणि दि.२५.०६.२०२४ रोजीच्या शासन निर्णयातील सर्व मार्गदर्शक सूचनांचे काटेकोरपणे अनुपालन करावे.
१०. वित्तीय औचित्याची सूत्रे आणि वित्तीय शिस्तीचे काटेकोरपणे पालन करावे.

२. सदर SBIePay सुविधा वापरण्याकरीता येणारी Transaction Cost प्रस्तावित करण्यात आल्यानुसार वापरकर्त्याकडून आकारली जाईल.

३. सदर शासन निर्णय वित्त विभाग अनौपचारिक सदंर्भ क्र. ९३/२०२५/व्यय-१६, दि.२१.०३.२०२५ आणि क्र. ११९/२०२५/कोषा प्रशा-५ , दि. २४.०३.२०२५ अनुसार दिलेल्या मान्यतेस अनुसरून निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक क्रमांक २०२५०४०४१६४६३३४११० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने स्वाक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

SHASHANK TUKARAM CHAVAN

Digitally signed by SHASHANK TUKARAM CHAVAN
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=INDUSTRIES ENERGY LABOUR AND MINING DEPARTMENT, 2.5.4.20=7dd1791f8c7f2d8cbabbae6c3c11ac3d4fe93ccab49daf36ff24dacd585e2276, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=A089DF063F1FFA9C6E2D052DB3C26C5B1ECE40048A4A7D39615BEE66D9E2053D, cn=SHASHANK TUKARAM CHAVAN
Date: 2025.04.04 16:49:12 +05'30'

**(शशांक चव्हाण)**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

प्रत :

(१) मा. मंत्री (उद्योग) यांचे खाजगी सचिव, उद्योग, उर्जा, कामगार व खनिकर्म विभाग.
(२) प्रधान सचिव (उद्योग), उद्योग, उर्जा, कामगार व खनिकर्म विभाग, मंत्रालय, मुंबई
(३) मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळ, अंधेरी (पू), मुंबई
(४) विकास आयुक्त (उद्योग), उद्योग संचालनालय, नवीन प्रशासकीय भवन, मुंबई
(५) अतिरिक्त विकास आयुक्त, मैत्री कक्ष, उद्योग संचालनालय, नविन प्रशासकीय भवन, मुंबई.
(६) सह सचिव (व्यय-१६) वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
(७) उप सचिव (कोषा प्रशा-५) वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
(८) महालेखापाल, महाराष्ट्र १ (लेखा व अनुज्ञेयता/ लेखा परीक्षा), मुंबई.
(९) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
(१०) निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई
(११) निवडनस्ती (उद्योग-३)